**प्रकल्पग्रस्त व्यक्ती व त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना तसेच भूकंपग्रस्तांना शासकीय सेवेतील गट-क व गट-ड मधील पदांवर नियुक्ती देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक विकाक २२१५ /प्र.क्र.३३७/१६-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ४ नोव्हेंबर, २०१६

**वाचा** :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक भूकंप १००९/प्र.क्र.२०७/२००९/१६-अ, दिनांक २७.८.२००९

**प्रस्तावना** :-

राज्यात दि. २७ ऑगस्ट २००९ पूर्वी भूकंपग्रस्तांसाठी असलेले समांतर आरक्षण प्रकल्पग्रस्तांसाठी असलेल्या ५ % आरक्षणांतर्गतच समाविष्ट होते. परतु शासन निर्णय दिनांक २७.८.२००९ अन्वये प्रकल्पग्रस्तांना असलेले ५% आरक्षण त्यांचेसाठीच राखून ठेवण्यात आले असून या आरक्षणांतर्गत भूकंपग्रस्तासाठी ठेवलेले आरक्षण काढून भूकंपग्रस्तांसाठी स्वतंत्रपणे २% समांतर आरक्षण लागू करण्यात आले आहे. आता शासनाच्या निदर्शनास असे आले आहे कि भूकंपग्रस्तांसाठी असलेल्या आरक्षणा अंतर्गत प्रत्येक वेळी पर्याप्त पात्रतेचे उमेदवार उपलब्ध होत नाहीत. याऊलट प्रकल्पग्रस्त बाधीतांची संख्या प्रचंड मोठी असल्याने त्या प्रवर्गासाठी राखीव ठेवण्यात आलेली पदे पुरेशी ठरत नाहीत. त्यामुळे आता या विषयी शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

दि. २१ जानेवारी १९८० च्या शासन निर्णयान्वये प्रकल्पग्रस्तांसाठी ५ % व दि. २७.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये भूकंपग्रस्तासाठी २ % असे स्वतंत्र आरक्षण निश्चित केले आहे. तथापि पर्याप्त पदांअभावी प्रकल्पग्रस्तांना नोकरी मिळण्यास विलंब होतो. त्यामुळे भूकंपग्रस्तांना राखीव असलेल्या २ % पदांवर नियुक्तीसाठी ज्या कुटुंबातील व्यक्तींचे भूकंपात निधन झाले आहे किंवा ज्यांचे घर पूर्णपणे कोसळले होते, त्यामुळे शासनाने त्यांना नविन घर बांधून दिले अशा व्यक्तींचे पाल्य नियुक्तीसाठी पात्र ठरतील. अशाप्रकारे भूकंपग्रस्तांचे पात्र उमेदवार उपलब्ध झाले नाही, तर ती पदे प्रकल्पग्रस्तांसाठी वापरण्यात यावीत, असा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. संबंधित भरती प्रक्रियेमध्ये भूकंपग्रस्तासाठी राखीव असलेल्या पदांवर भूकंपबाधित उमेदवार उपलब्ध झाले नाहीत, असे प्रशासकीय विभाग म्हणून महसूल व वन विभाग ( पुनर्वसन कक्ष ) यांनी प्रमाणित करणे आवश्यक राहील.

३. भूकंपग्रस्तांसाठी राखीव असलेल्या पदावर प्रकल्पग्रस्ताची नियुक्ती झाली तर, प्रकल्पग्रस्त उमेदवारांकडे प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्र असणे आवश्यक राहील, तसेच त्यांची नियुक्तीसाठी विहित कमाल वयोमर्यादा ही ४५ वर्षे राहील.

४. भूकंपबाधित जिल्हयामध्ये नोंदणीकृत भूकंपग्रस्त उमेदवार जे अद्यापही शासन नोकरीपासून वंचित आहेत, त्यांच्या याद्या त्यांच्या शैक्षणिक पात्रतेसह बनवून त्याची आकडेवारी योग्य असल्याचे महसूल व वन विभाग (पुनर्वसन कक्ष) यांनी खातरजमा करावी. भूकंपग्रस्त उमेदवारांची संख्या समाप्त झाल्यावर पूर्ण ७ % आरक्षण प्रकल्पग्रस्तांसाठी राहील.

५. सदर शासन निर्णय महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन कक्ष) यांनी दिलेल्या अनौपचारिक संदर्भ क्र.२१७९, दिनांक २०.६.२०१६ व संदर्भ क्र. २८०१, दिनांक २८.०७.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१६११०४१६४११७४७०७ हा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Tikaram Waman Karpate

Digitally signed by Tikaram Waman Karpate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395c596b57a69fe04109b8c8191e7389cff5eda3fac16c6f8263be7fbbd319d, cn=Tikaram Waman Karpate
Date: 2016.11.04 16:43:55 +05'30'

**( टि.वा.करपते )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
२) सर्व सन्माननीय विधानसभा/विधान परिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई ३५.
४) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
५) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा.मुख्य सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
७) प्रधान सचिव महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
१०) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
११) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई, नागपूर व औरंगाबाद,
१२) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, नागपूर व औरंगाबाद,
१३) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, नागपूर व औरंगाबाद,
१४) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई ३२
१५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ३२
१६) प्रधान सचिव (महाराष्ट्र विधान परिषद), महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई ३२
१७) प्रधान सचिव (महाराष्ट्र विधान सभा), महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई ३२
१८) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई ३२
१९) महासंचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई ३२ (५ प्रती)
त्यांना विनंती की, प्रस्तुत शासन परिपत्रक प्रसिध्दीसाठी पाठवावे.
२०) सर्व महानगर पालिकांचे आयुक्त
२१) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका, महाराष्ट्र राज्य
२२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य
२३) राज्यातील सर्व महामंडळे,मंडळे आणि सार्वजनिक उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक
२४) उपसचिव, (आस्थापना) सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय, मुंबई ३२
२५) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय (बायोमेट्रिक उपस्थितीसंदर्भात),
२६) विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)
२७) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती)
२८) निवड नस्ती (कार्यासन १६-अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२